**२२०३ - तंत्र शिक्षण भाग-२ या मुख्य लेखाशिर्षातंर्गत मंजूर पदांपैकी ७९८ योजनेतर अस्थायी पदांना दिनांक ०१/०६/२०१८ ते दिनांक ३०/०९/२०१८ पर्यत मुदतवाढ देण्यास मंजूरी देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**कौशल्य विकास व उद्योजकता विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : अपमु-२०१८/प्र.क्र. ४४/व्यशि-४**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ३० जून, २०१८

**संदर्भ :** १) सह संचालक,व्यवसाय शिक्षण शिक्षण व प्रशिक्षण, संचालनालय, मुंबई यांचे पत्र क्र. ४/ आस्था-३/मुदतवाढ/२०१८/(१६/२७)/७६३, दिनांक २०/०५/२०१८.

२) वित्त विभाग, शासन निर्णय क्र.असंक १००१ / प्र.क्र.२९/ २००१ वित्तिय सुधारणा, दिनांक १०/०९/२००१.

३) वित्त विभाग, शासन निर्णय क्र.असंक/१००४/प्रक्र.१२ (भाग-२)/२००४/वित्तीय सुधारणा-१, दिनांक ०४/१०/२००४.

४) शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, क्र.व्हीओसी/२१०५/(३९१/०५)/व्यशि-३, दिनांक २५/०७/२००७.

५) वित्त विभाग शासन निर्णय क्र. पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क.,दि.०५/०३/२०१८

६) कौशल्य विकास व उद्योजकता विभाग, शासन निर्णय क्र. अपमु- २०१८ /प्र.क्र.४४/ व्यशि-४, दिनांक ३१/०३/२०१८

**प्रस्तावना :**

वित्त विभागाच्या दिनांक १०/०९/२००१ च्या शासन निर्णयाच्या अनुषंगाने व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालयाच्या अधिपत्याखालील मुख्य कार्यालय, महाराष्ट्र राज्य व्यवसाय शिक्षण परीक्षा मंडळ, सर्व प्रादेशिक कार्यालये, जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिकारी कार्यालय, शासकीय तांत्रिक विद्यालये/केंद्रे इत्यादी कार्यालयामधील पदांचा आढावा दिनांक २५/०७/२००७ च्या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आला असून त्याचा तपशील पुढीलप्रमाणे आहे : -

| अ.क्र. | कार्यालयाचे नांव | मंजूर पदांचा तपशील |
|---|---|---|
| १ | मुख्य कार्यालय | ७३ |
| २ | प्रादेशिक कार्यालये | २३६ |
| ३ | म.रा.व्यवसाय शिक्षण परीक्षा मंडळ, वांद्रे (पूर्व), मुंबई-५१ | ४७ |
| ४ | जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिकारी कार्यालय | ३९८ |
| ५ | शासकीय तांत्रिक विद्यालय | २५९६ |
| ६ | प्रमाणपत्र अभ्यासक्रम राबविणा-या संस्था | २४ |
| | **एकूण** | **३३७४** |

उपरोक्त मंजूर ३३७४ पदांपैकी ५७५ पदे आढाव्यापूर्वीच स्थायी करण्यात आलेली असून दिनांक ०८/१२/२००९ च्या शासन निर्णयान्वये २००१ पदे स्थायी करण्यात आली आहेत. सदर २५७६ स्थायी पदे वगळता उर्वरित ७९८ अस्थायी पदांना वित्त विभागच्या शासन निर्णयान्वये वेळोवेळी आवश्यकतेनुसार मुदतवाढ देण्यात आली आहे. वित्त विभाग शासन निर्णय क्रमांक पदनि-२०१६/ प्र.क्र.८/ १६/आ.पु.क., दिनांक ०५/०३/२०१८ नुसार दिनांक ०१/०३/२०१८ ते दिनांक ३०/०९/२०१८ पर्यत मुदतवाढ देण्याचे अधिकार प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेले आहेत. सदर पदांची आवश्यकता लक्षात घेता वित्त विभागाच्या शासन निर्णयानुसार सदर पदांना दिनांक ०१/०३/२०१८ ते दिनांक ३०/०९/२०१८ पर्यत मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय :</u>**

खालील कार्यालयातील शासन याव्दारे व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालयाच्या अधिपत्याखालील उर्वरित ७९८ योजनेतर अस्थायी पदांना दिनांक ०१/०३/२०१८ ते दिनांक ३०/०९/२०१८ पर्यंत खालील अटीं व शर्तींच्या अधीन राहून मुदतवाढ देण्यात येत आहे :-

| अ. क्र. | कार्यालयाचे नांव | मुदतवाढ मंजूर केलेल्या अस्थायी पदांचा तपशील |
|---|---|---|
| १) | मुख्य कार्यालय | २३ |
| २) | प्रादेशिक कार्यालये | ४१ |
| ३) | म.रा.व्यवसाय शिक्षण परीक्षा मंडळ, वांद्रे (पूर्व), मुंबई-५१ | १४ |
| ४) | जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिकारी कार्यालय | ११२ |
| ५) | शासकीय तांत्रिक विद्यालय | ६०७ |
| ६) | प्रमाणपत्र अभ्यासक्रम राबविणा-या संस्था | ०१ |
| | **एकूण** | **७९८** |

**<u>अटी व शर्ती</u>**

१) ज्या प्रयोजनासाठी उपरोक्त पदे निर्माण करण्यात आली आहेत, त्याच प्रयोजनासाठी त्याचा विनियोग करण्यात यावा.

२) अस्थायी पदांपैकी कोणतीही पदे ६ महिन्यापेक्षा किंवा त्यापेक्षा अधिक कालावधीकरिता रिक्त नाही, याची खातरजमा करावी.

३) सदर कालावधीमध्ये मंजूर पदांच्या आढाव्यास, तसेच सुधारीत आढाव्यास) नव्याने निर्माण केलेली पदे आकृतीबंधात समाविष्ट करुन (उच्चस्तरीय सचिव समितीची मान्यता घेण्याची दक्षता घेण्यात यावी.

या प्रस्तावावर होणारा खर्च खालील लेखाशिर्षाखाली खर्ची घालण्यात यावा व याबाबत होणारा खर्च सन २०१८-२०१९ या वित्तीय वर्षामध्ये मंजूर असलेल्या तरतुदीमधून भागविण्यात यावा.

१) **मागणी क्र. झेड ए-१, २२०३- तंत्र शिक्षण ००१- संचालन व प्रशासन, (०१) संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, (०१)(०१), संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, दत्तमत (२२०३ ३३७१).**

**२) मागणी क्र. झेड ए-१, २२०३- तंत्र शिक्षण, १०३-तंत्र शाळा (०१) शासकीय तंत्र माध्यमिक शाळा (योजनेतर), (०१)(०१) शासकीय तंत्र माध्यमिक शाळा, दत्तमत (२२०३ ३३९१).**

**३) मागणी क्र. झेड ए-१,२२०३- तंत्र शिक्षण, १०३-तंत्र शाळा, (०२) शासकीय औद्योगिक संस्था, (०२)(०१) शासकीय औद्योगिक शाळा, दत्तमत (२२०३ ३३३५).**

**४) मागणी क्र. झेड ए-१, २२०३- तंत्र शिक्षण, १०८- परिक्षा, (०१) व्यवसाय परीक्षा मंडळ, (०१)(०१) व्यवसाय शिक्षण परिक्षा मंडळ, दत्तमत (२२०३ ३३५३).**

सदर शासन निर्णय वित्त विभाग शासन निर्णय क्रमांक पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दिनांक ०५/०३/२०१८ नुसार प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८०७०२११३७०२७६०३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Santosh Vithal Rokade

Digitally signed by Santosh Vithal Rokade
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Skill Development Development, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ca5751ffedbb005fdff34ab6ac1f8319d061483d7d35e20f744e251360f7920a, serialNumber=ecf4a9abe84c70de989c3669424c12b6cadcb583d500fe489ce8727916e0bbee, cn=Santosh Vithal Rokade
Date: 2018.07.02 11:38:02 +05'30'

**( संतोष वि. रोकडे )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१) संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई-०१.
२) सहसंचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, प्रादेशिक कार्यालय, मुंबई/ पुणे/ नाशिक/ औरंगाबाद/ अमरावती/नागपूर. (संचालनायामार्फत)
३) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई/महाराष्ट्र-२, नागपूर.
४) महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१,मुंबई/महाराष्ट्र-२, नागपूर.
५) मा. विरोधी पक्षनेता, विधान परिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
६) मा. विरोधी पक्षनेता, विधान सभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
७) सर्व जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिकारी कार्यालये ( संचालनायामार्फत )
८) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी ( संचालनालयामार्फत )
९) मुख्याध्यापक, शासकीय तांत्रिक विद्यालय/केंद्र ( संचालनालयामार्फत )
१०) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
११) निवड नस्ती.व्यशि-४.